प्रतिनियुक्तीने नियुक्ती-
झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, पुणे व पिंपरी चिंचवड क्षेत्र, पुणे या कार्यालयात

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि २५१९/प्र.क्र.२०/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २० फेब्रुवारी, २०१९

**शासन आदेश**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले आहे. मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत करावयाची कार्यपध्दती याबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१७/प्र.क्र.१२०/१४, दिनांक ३१.८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेली आहे. या शासन निर्णयातील तरतूदीनुसार मंत्रालयीन विभागातील खाली नमूद केलेल्या सहायक कक्ष अधिकाऱ्याची सेवा गृहनिर्माण विभागाच्या अखत्यारीतील झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, पुणे व पिंपरी चिंचवड क्षेत्र, पुणे या कार्यालयातील "सहायक" या पदावर प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | सहायक कक्ष अधिकाऱ्याचे नांव व विभाग | प्रतिनियुक्तीचे ठिकाण | प्रतिनियुक्तीच्या ठिकाणावरील पद + वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १. | श्री.भू.ब.गायकवाड, नगर विकास विभाग | झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, पुणे व पिंपरी चिंचवड क्षेत्र, पुणे. | सहायक (वेतनश्रेणी ९३००-३४८०० + ग्रेड वेतन ४३००) |

२. श्री. भू.ब.गायकवाड, सहायक कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग यांची प्रतिनियुक्ती धोरणातील ७ वर्षे सेवेची अट शिथिल करुन त्यांच्या सेवा झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, पुणे व पिंपरी चिंचवड क्षेत्र, पुणे या कार्यालयात प्रथमत: २ वर्षाच्या कालावधीसाठी खालील अटी व शर्तीनुसार प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात येत आहेत.

(अ) ज्या तारखेला शासकीय सेवेतील पदाचा कार्यभार सुपूर्द करील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला संबंधित कर्मचारी आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारील त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्याला परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/संवर्ग नियंत्रण अधिकारी/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्याला मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्याने मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्याला मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

३. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा...इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक १७-१२-२०१६ व १६-०२-२०१८ मधील तरतुदी विचारात घेऊन, नगर विकास विभागाने प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती याबाबत गृहनिर्माण विभाग(झोपसू) यांच्याशी सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

४. श्री. गायकवाड, सहायक कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी त्यांचे प्रशासकीय विभाग आणि गृहनिर्माण विभाग(झोपसू) यांचेमार्फत हाताळण्यात येतील

५. श्री. गायकवाड यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी विभागाने तत्काळ कार्यमुक्त करावे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२२०१६२४४०३००७ असा आहे. सदरहू आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2019.02.20 16:26:29 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.भू.ब.गायकवाड, सहायक कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, (विभागामार्फत)

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, नगर विकास विभाग/गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, पुणे -४११०१६
४) सह/उप सचिव (आस्थापना), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांच्या विभागातील संबंधित सहायक कक्ष अधिकारी यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देताना परिच्छेद ३ मध्ये नमूद केल्यानुसार कार्यवाही करुन काढण्यात आलेल्या आदेशाची प्रत या कार्यासनाकडे तात्काळ पाठविण्यात यावी.
५) सह/उप सचिव (झोपसू), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
त्यांना विनंती करण्यात येते की, श्री. गायकवाड, सहायक कक्ष अधिकारी यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने त्वरेने उपलब्ध होतील याबाबत त्यांनी नगर विकास विभाग (नवि-३) या कार्यासनाकडे पाठपुरावा करावा.
६) सा.प्र.वि./का.क्र.१४-अ (संग्रहार्थ/निवड नस्ती)